**अधिवेशन कालावधी दरम्यान बैठकांचे आयोजन करण्याबाबत देण्यात येणाऱ्या आश्वासनांची पूर्तता...**




**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
परिपत्रक क्रमांक क. संकीर्ण २०२५/प्र.क्र.३५/सहा
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २९ /०५/ २०२५

<u>परिपत्रक:-</u>

विधानमंडळाच्या अधिवेशनादरम्यान विविध आयुधांवर चर्चा केली जाते. चर्चेच्यावेळी मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांच्याकडून अत्यंत गंभीर अथवा तातडीच्या विषयाबाबत अधिवेशन कालावधीतच बैठक आयोजित करण्यात येईल असे आश्वासनदेण्यात येते.तथापि, अनेक वेळा असे दिसून येते की, विभागाकडून विधानमंडळाकडून कार्यवृत्त प्राप्त झाल्यानंतर बैठक आयोजित करण्याची कार्यवाही करण्यात येते. वास्तविक जेव्हा मा. मंत्री/मा. राज्यमंत्री अधिवेशन कालावधीत बैठक घेण्याचे आश्वासन देतात तेव्हा त्यावेळी विभागाने कार्यवृत्त येण्याची वाट न पाहता, सदर बैठकीचे आयोजन करुन आश्वासनांची पूर्तता करणे आवश्यक आहे. वास्तविक सभागृहात देण्यात आलेल्या आश्वासनांची विहित कालावधीत पूर्तता होणे ही शासनाची वैधानिक जबाबदारी आहे. तथापि, मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांनी वरीलप्रमाणे दिलेल्या आश्वासनांची पूर्तता विहित कालावधीत होत नसल्याचे दिसून येते. संसदीय कार्य विभागामार्फत मंत्रालयीन विभागांना संपूर्ण अधिवेशन कालावधीत दोन्ही सभागृहांच्या गॅलरीमध्ये त्यांच्या विभागाचे अधिकारी यांनी उपस्थित राहून सभागृहातील मुद्दे, आश्वासने, निर्देश, बैठक घेण्याच्या आश्वासनांची नोंद घेण्याबाबत व त्यानुसार तात्काळ कार्यवाही करण्याबाबत प्रत्येक अधिवेशनापूर्वी परिपत्रक निर्गमित केले जाते. तथापि, सभागृहांमध्ये अधिवेशन कालावधीत बैठक आयोजित करण्याबाबत देण्यात आलेल्या आश्वासनांची नोंद घेतली जात नसल्याचे दिसून येते. यास्तव वरीलप्रमाणे देण्यात आलेल्या आश्वासनांची पूर्तता विहित कालावधीतच करण्याची कृपया दक्षता घ्यावी.

२. सर्व विभागांना या परिपत्रकाअन्वये सूचना देण्यात येत आहेत की, संपूर्ण अधिवेशन कालावधीत त्यांच्या अधिकाऱ्यांनी प्रत्यक्ष सभागृहाच्या गॅलरीत उपस्थित राहून चर्चेच्या वेळी मुद्दे, आश्वासन, निर्देश, बैठक घेण्याच्या आश्वासनांची नोंद घेऊन विहित कालावधीतच बैठक आयोजित करण्याबाबत कार्यवाही करावी. अशा प्रसंगी विभागाने कार्यवृत्त येण्याची वाट न पाहता बैठकीचे आयोजन करुन आश्वासनाची पूर्तता तात्काह

करावी. काही कारणास्तव बैठक आयोजित करणे शक्य न झाल्यास पुढील अधिवेशनाच्या आत बैठकीचे आयोजन करावे.

३. प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०५२९१२३३२९२४१५ हा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावांने व आदेशानुसार,

PRABHAKARRAO BABURAO PAWAR

Digitally signed by PRABHAKARRAO BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PARLIAMENTRY AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=1cd8e5208d41651649aad3dd997ce3bf5f06940cc08f9290f36d5ec59f3ec38a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=998CDB336CF1F9771D0E313136854C5C66D69D7F809041F17DAB870EE978CC5A, cn=PRABHAKARRAO BABURAO PAWAR
Date: 2025.05.29 12:34:29 +05'30'

(प्र. बा. पवार)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई.
२) सर्व सह सचिव/उप सचिव, मंत्रालयीन विभाग (विधानमंडळ कामकाज समन्वय कक्ष), मुंबई
३) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय मुंबई
४) सर्व कार्यासन अधिकारी, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय मुंबई
५) निवड नस्ती.